येतें. पण आता अगदी दोघांच्याच अशा गोष्टी बोलाव्या तरी कुठे लागतात? एकमेकाची मनः-स्थिति कळायला बोलायची गरज आहेच कुठे? पाठ-मोरा असला तरी नाही का मला समजत की आज कांहीतरी बिघडलें आहे म्हणून? मला लांबूनच पाहून तो नाही का विचारीत, " आज काय ग झालं आहे? "–ठण्–घड्याळांत अर्ध्या तासाचा ठोका वाजला. ओळख करून देणाऱ्या बाईंची गडबड उडाली. " तेव्हा ह्या...ची कन्या आहेत, सुप्रसिद्ध महर्षि ह्यांच्या सूनबाई आहेत, सुप्रसिद्ध प्राध्यापक ह्यांच्या पत्नी आहेत, व स्वतःसुद्धा शिकलेल्या आहेत. मी त्याना आता भगिनींना चार शब्द सांगण्याची विनंती करतें. " असें म्हणून त्या मटकन् खाली बसल्या. मला थोडें हसूं आलें. माझ्या भटक्या मनाला आवरून माझें भाषण केलें व समारंभ आटोपला.

पण बाईंनी करून दिलेली ओळख अपूर्ण आहे व त्यांत कांहीतरी राहिलें ही हुरहूर मनाला लागली ती कांही जाईना. दोन दिवसांनी मी घाईघाईने रस्त्यांतून जात होतें. संध्याकाळ संपत आली होती, पण रात्र अजून पडली नव्हती. रस्याच्या कडेने मुलाचे घोळके घराच्या दारापुढून उभे होते. चार भिंतींच्या कोंडवाड्यांत जाण्याचा क्षण तीं जरा